श्री. व्हि.गिरीराज (भा.प्र.से. सेवानिवृत्त) अध्यक्ष, पाचवा महाराष्ट्र वित्त आयोग यांच्या नियुक्तिसंदर्भातील अटी व शर्ती...

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मविआ २०१८/प्र.क्र.२८/वित्त आयोग कक्ष**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१८

**पहा :-** शासन अधिसूचना क्र. राविआ-२०१७/प्र.क्र.३३/विआक, दि.२८ मार्च, २०१८

**प्रस्तावना :-**

भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २४३-आय व २४३-वाय च्या तसेच महाराष्ट्र वित्त आयोग (संकिर्ण तरतूदी) अधिनियम, १९९४ च्या तरतूदींना अनुसरुन महाराष्ट्र वित्त आयोगाची स्थापना करण्यात येते. दि.३० जानेवारी, २०१८ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयानुसार श्री. व्हि.गिरीराज (भा.प्र.से. सेवानिवृत्त) यांच्या अध्यक्षतेखाली पाचवा महाराष्ट्र वित्त आयोगाची स्थापन संदर्भाधीन दि.२८ मार्च,२०१८ रोजीच्या अधिसूचनेनुसार करण्यात आली आहे.

श्री. व्हि.गिरीराज (भा.प्र.से. सेवानिवृत्त), अध्यक्ष, पाचवा महाराष्ट्र वित्त आयोग यांच्या नियुक्तिच्या संदर्भातील अटी, शर्ती व इतर बाबी विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

शासनाच्या आदेशाद्वारे श्री. व्हि.गिरीराज (भा.प्र. से., सेवानिवृत्त) ,अध्यक्ष, पाचवा महाराष्ट्र वित्त आयोग यांच्या नियुक्तिबाबतच्या अटी, शर्ती व अन्य बाबी खालीलप्रमाणे विहीत करण्यास मान्यता देत आहे.

**१.१. वेतन व भत्ते -**

अध्यक्ष यांना त्यांनी अपर मुख्य सचिव या पदावर घेतलेल्या अंतिम वेतनातून त्यांच्या निवृत्ती वेतनाची रक्कम वजा करून उर्वरित रक्कम वेतन म्हणून देय असेल. आयोगाचे अध्यक्ष यांना त्यांच्या एकूण वेतनावर भारतीय प्रशासन सेवेच्या तत्सम श्रेणीतील अधिका-यांना ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल त्याच दराने महागाई भत्ता देण्यात येईल. तथापि, अध्यक्ष यांना निवृत्ती वेतनावर महागाई भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

**१.२. निवास व्यवस्था-**

अध्यक्ष, आपल्या संपूर्ण पदावधीमध्ये तसेच त्यानंतरच्या लगतच्या १५ दिवसांपेक्षा अधिक नसेल एवढया कालावधीसाठी मोफत भाडे तत्वावर सरकारी निवासस्थान सदनिका मिळण्यास पात्र असतील.

**१.३. रजा-**

अध्यक्ष हे पुढीलप्रमाणे रजा मिळण्यास पात्र असतील :-

**(एक)** सेवेच्या पूर्ण केलेल्या प्रत्येक वर्षासाठी किंवा त्याच्या भागासाठी ३० दिवसांची अर्जित रजा :

परंतु, ही अर्जित रजा रजेच्या खात्यामध्ये, प्रत्येक कॅलेंडर वर्षाच्या जानेवारी व जुलै महिन्याच्या पहिल्या दिवशी प्रत्येक १५ दिवस याप्रमाणे दोन हप्त्यांमध्ये आगाऊ जमा केली जाईल :

परंतु, आणखी असेही अगोदरच्या अर्ध वर्षाच्या शेवटी खात्यात जमा झालेली रजा पुढील अर्ध वर्षामध्ये जमेस धरण्यात येईल व अशाप्रकार उपार्जित झालेली रजा ३०० दिवसांपेक्षा अधिक असणार नाही.

**(दोन)** भारतीय प्रशासन सेवेच्या तत्सम दर्जाच्या सदस्यास अनुज्ञेय असलेली नैमित्तिक रजा आणि इतर रजा.

**१.४. रजा मंजूरी प्राधिकारी-**

यासंदर्भात शासनाच्या वित्त विभागाचे प्रभारी मंत्री मंजूरी प्राधिकारी असतील.

**१.५. वाहन व्यवस्था व दूरध्वनी सुविधा-**

अध्यक्षांना वाहन व्यवस्था व दूरध्वनी व्यवस्था याकरिता रु.५०,०००/- दरमहा इतकी ठोक रक्कम देण्यात येईल.

**१.६. प्रवास भत्ता-**

भारतीय प्रशासकीय सेवेतील तत्सम श्रेणीच्या सदस्याला लागू असेल अशा दराने प्रवास भत्ता, दैनिक भत्ता, वैयक्तिक चीजवस्तूंची वाहतूक आणि इतर बाबींसाठी झालेला खर्च मिळण्यास पात्र राहतील.

अध्यक्ष यांना वित्त विभागाच्या प्रभार मंत्र्यांची पूर्व परवानगी घेतल्याखेरीज त्यांच्या कार्यालयीन प्रयोजनांसाठी परदेश दौऱ्यावर जावू शकणार नाहीत आणि त्याशिवाय, राज्यातील भारतीय प्रशासकीय सेवेतील तत्सम श्रेणीच्या सदस्याला लागू असल्यानुसार, केंद्र शासनाकडून परवानगी मिळवतील.

**१.७. शासकीय बैठकीवरील खर्च -**

ज्या बैठकांमध्ये चहा, कॉफी आणि अल्पोपहाराची तरतूद करण्यात येते त्या बैठकांमध्ये त्यासाठी करावयाचा खर्च अध्यक्ष प्राधिकृत करु शकतील.

२. वित्त आयोगाचे अध्यक्ष पद भूषविणारी व्यक्ती अध्यक्ष पदाव्यतिरिक्त त्याच कालावधीमध्ये शासकीय/ निमशासकीय प्राधिकरणाची इतर कामे पार पाडत असल्यास सदर कामाचे आर्थिक लाभ त्यांना अनुज्ञेय होणार नाहीत.

३. उपरोक्त अटी, शर्ती व अन्य बाबींच्या संबंधाने कोणतीही शंका उद्भवल्यास किंवा एखाद्या विशिष्ट प्रकरणाविषयी स्पष्ट तरतूद केलेली नसेल तेव्हा ती बाब शासनाकडे विचारार्थ पाठविण्यात येईल व शासनाचा निर्णय अंतिम असेल.

४. अध्यक्ष, ५ महाराष्ट्र वित्त आयोग यांच्या वेतनावरील खर्च, भत्ते व इतर खर्च मागणी क्र. जी-२, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ८०० इतर खर्च (०३)(०२) राज्य वित्त आयोग (२०७००६३९) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. महाराष्ट्र वित्त आयोगाची स्थापना ही सांविधानिक स्वरुपाची असल्याने आयोगाच्या अध्यक्षांच्या नियुक्तिबाबतच्या अटी, शर्ती व उपरोक्त अन्य बाबी ह्या इतर कोणत्याही आयोगाकरिता पूर्व उदाहरण म्हणून ग्राह्य धरता येणार नाहीत.

६. उपरोक्त शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२८१६५८३१०००५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rajagopal Devara
Date: 2018.09.29 11:34:47 +05'30'

**( राजगोपाल देवरा )**
प्रधान सचिव (वित्त)

**प्रति,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. वित्त मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
४. मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभाग
५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानसभा/ विधानपरिषद), मुंबई
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन ,मुंबई.
१३. विशेष आयुक्त, नवीन महाराष्ट्र सदन, कस्तुरबा गांधी मार्ग, नवी दिल्ली-११०००१.
१४. सामान्य प्रशासन विभाग,कार्यासन १३, मंत्रालय, मुंबई,
१५. वित्त विभाग, कार्यासन- प्रशासन १, रोख, व्यय २, सेवा ५, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती, वित्त विभाग (वित्त आयोग कक्ष)